**महाड, जिल्हा रायगड-अलिबाग येथे दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) स्थापन करण्याबाबत व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. न्यास्थाप ०७२२/६७१ /प्र.क्र.९५/कार्यासन११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ७ जुलै, २०२३

**वाचा** :-१.मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. No: B(W)A-१२०२/२००८/१२८६/२०६११, दि.२८/६/२०२२
२.जिल्हा न्यायालय, रायगड-अलिबाग यांचे No.प्रशा/३१६८/२०२२, दि.२३/६/२०२२
३. वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे क्र.पदनि- २०२३/प्र.क्र.९/आपुक,दि.२१/२/२०२३ व क्र. पदनि- २०२३/प्र.क्र.१३/आपुक,दि.१०/४/२०२३ रोजीची पत्रे.( पदनिर्मितीबाबत कार्यवृत्त )
४.वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क. दि.२७/४/२०२२

**प्रस्तावना:-**

मा. उच्च न्यायालयाच्या दि. ४/४/२००७ च्या मानक प्रारुपानुसार ( Standard Format) राज्यात विविध ठिकाणी नवीन न्यायालय सुरु करण्यासाठी प्रलंबित खटले / प्रकरणांची संख्या किमान ५०० असावी. त्याचबरोबर पायाभूत सुविधा उदा. न्यायालयीन इमारत आणि न्यायाधीशांची निवासस्थाने यांची उपलब्धता असावी. मा.उच्च न्यायालयाच्या धोरणानुसार आवश्यक सर्व निकष पूर्ण होत असल्याने महाड, जि.रायगड-अलिबाग येथे दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) हे न्यायालय स्थापन करण्यास मा. उच्च न्यायालयाच्या "न्यायालय स्थापना समितीने" मान्यता दिली आहे. उच्चस्तरीय सचिव समिती व मा. मंत्रिमंडळाने मान्यता दिल्यानुसार सदर न्यायालय स्थापन करण्यास मंजूरी देण्याबाबतचे व त्यानुषंगाने पदनिर्मिती बाबतचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाड, जिल्हा रायगड-अलिबाग येथे दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) स्थापन करण्यास व त्याकरीता न्यायालय सुरु होण्याच्या दिनांकापासून , पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार १६ नियमित पदे निर्माण करण्यास व ४ मनुष्यबळांच्या सेवा बाहययंत्रणेद्वारे घेण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर ), जि. रायगड-अलिबाग**

| अ.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | नव्याने निर्माण केलेल्या पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर | Pay in Judiciary Services | १ |
| २ | अधिक्षक | एस-१६-४४९००-१४२४०० | १ |
| ३ | सहायक अधीक्षक | एस-१५-४१८००-१३२३०० | २ |
| ४ | लघुलेखक (ग्रेड-२) | एस-१५-४१८००-१३२३०० | १ |
| ५ | वरिष्ठ लिपीक | एस-८-२५५००-८११०० | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | कनिष्ठ लिपीक | एस-६-१९९००-६३२०० | ६ |
| ७ | बेलिफ | एस-६-१९९००-६३२०० | ३ |
| **एकूण पदे** | | | **१६** |

**बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा**

| **अ.क्र.** | **सेवा** | **मनुष्यबळ संख्या** |
|---|---|---|
| १ | बहुद्देशिय वर्ग-४ कर्मचारी ( शिपाई, सफाईगार, पहारेकरी ) | ४ |
| **एकूण मनुष्यबळ** | | **४** |

बाह्ययंत्रणेद्वारे सेवा घेताना वित्त विभागाच्या दि.२७/४/२०२२ च्या शासन निर्णयातील तरतुदींचे पालन करण्याची दक्षता संबंधित न्यायालयाने घ्यावी.

उपरोक्त नव्याने निर्माण केलेली पदे भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दि.३१/८/२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूर देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दि.३१/८/२०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान, १०५ दिवाणी व सत्र न्यायालय, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश,(०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२) (दत्तमत) (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. या अनुषंगाने निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील .

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र. ६९२ /आपुक, दि.६/१२/२०२२व अनौपचारिक संदर्भ क्र. ६६३ /व्यय ५, दि.३/७/२०२३अन्वये तसेच दि. २८ जून,२०२३ रोजी झालेल्या मा. मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०७१७४५०६३९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.07.07 17:45:55 +05'30'

**( विलास व्ही. गायकवाड )**

**विधि सल्लागार- नि- सह सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद.
५. सर्व विधानमंडळ सदस्य. विधानमंडळ, मुंबई.
६. सर्व मंत्री यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
९. प्रबंधक (निरीक्षणे- १) , उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
१०. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि. रायगड-अलिबाग
११. दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, महाड, जि. रायगड-अलिबाग
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. रायगड-अलिबाग
१४. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-५ / आ.पु.क./सेवा ९, मंत्रालय, मुंबई.
१५. विधि व न्याय विभाग, कार्यासन- १२,१३,२३, व २४ मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.